पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे अधिपत्याखालील, पोलीस अधिक्षक, सोलापूर यांचे अंतर्गत माढा पोलीस ठाणे येथील पोलीस निरीक्षकाचे पद कुर्डूवाडी पोलीस ठाणे येथे वर्ग करणे व कुर्डूवाडी पोलीस ठाणे येथील सहाय्यक पोलीस निरीक्षका चे पद माढा पोलीस ठाणे येथे वर्ग करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय क्र. अपीओ १२१०/११६/प्र.क्र.२३०/पोल-३

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ दिनांक १८ ऑक्टोबर, २०१०.

**वाचा:-** पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/ २६-अ/ ४७/ सोलापूर ग्रा. (कुर्डूवाडी)/ ४९/ २०१०, दि.१४.६.२०१०.

**प्रस्तावना :-** कुर्डूवाडी पोलीस ठाण्याची मागील तीन वर्षांची गुन्ह्यांची आकडेवारी माढा पोलीस ठाण्याच्या आकडेवारीपेक्षा अधिक असणे, तसेच कुर्डूवाडी पोलीस ठाण्याचे कार्यक्षेत्र औद्योगिक वसाहती, इतर उद्योग धंदे, कारखाने, धार्मिक स्थळे, शासनाची महत्वाची कार्यालये, नगरपरिषद त्याचप्रमाणे कुर्डूवाडी हे शहराचे ठिकाण असून त्याची एकूण लोकसंख्या २७३०० इतकी असणे. माढा पोलीस ठाणेचे व कुर्डूवाडी पोलीस ठाण्याचे कार्यक्षेत्रातील लोकसंख्या, गुन्ह्यांची आकडेवारी व इतर बाबींची तौलनिक अभ्यास व विचार करता माढा पोलीस ठाण्याच्या प्रभारी अधिकाऱ्याचे " पोलीस निरीक्षका"चे पद कुर्डूवाडी पोलीस ठाणेस वर्ग करणे व कुर्डूवाडी येथील "सहाय्यक पोलीस निरीक्षक " हे पद माढा पोलीस ठाणेस वर्ग करणेबाबत पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त नमूद पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-** उपरोक्त प्रस्तावाचा सर्वांगीन विचार करून पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे अधिपत्याखालील, पोलीस अधिक्षक, सोलापूर यांचे अंतर्गत माढा पोलीस ठाणे येथील **"पोलीस निरीक्षकाचे"** पद कुर्डूवाडी पोलीस ठाणे येथे वर्ग करणे व कुर्डूवाडी पोलीस ठाणे येथील **"सहाय्यक पोलीस निरीक्षका"** चे पद माढा पोलीस ठाणे येथे वर्ग करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१०१६१५४१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(न.म.शिंदे)

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति - माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.

३) पोलीस आयुक्त, सोलापूर.

४) पोलीस अधिक्षक, सोलापूर.

५) प्रधान महालेखापाल, (लेखा परिक्षा)- १ महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६) महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई.

७) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.

८) कक्ष अधिकारी पोल-४, पोल- ५ ब, पोल-७ गृह विभाग, मुंबई.

९) निवड नस्ती, पोल ३.

D:\Kubail २०१०\Pol ३\Aug\G RCR २३०.lwp